"राज्यातील संवेदनशील वनक्षेत्रात वनसंरक्षणा करीता राज्य राखीव पोलीस दलाच्या तीन तुकडया कायमस्वरुपी वन विभागाकडे ठेवणे" या योजनेतर योजनेखालील अस्थायी पदे सन २०२०-२१ मध्ये पुढे चालू ठेवण्याबाबत.

महाराष्ट्र शासन

महसूल व वन विभाग

शासन निर्णय क्रमांक:- टिआरएस-०२/२०२०/प्र.क्र.४६/फ-६

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक :- ३१ मार्च, २०२०

वाचा :- १) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र.टिआरएस-०३/२०१९/प्र.क्र.४४/फ-६, दिनांक १६.३.२०१९.

२) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र.टिआरएस-०३/२०१९/प्र.क्र.४४/फ-६, दिनांक १६.३.२०१९

३) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष ३/योजनेत्तर/प्र.क्र.४०/१९-२०/१७६१, दिनांक १८.२.२०२०.

४) शासन निर्णय वित्त विभाग क्र. पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक १२.२.२०२०

शासन निर्णय :-

"राज्यातील संवेदनशील वनक्षेत्रात वनसंरक्षणाकरीता राज्य राखीव पोलीस दलाच्या तीन तुकडया कायमस्वरुपी वन विभागाकडे ठेवणे" या योजनेतर योजनेमधील ३८ अस्थायी पदांना दिनांक १.१०.२०१९ ते २९.२.२०२० पर्यत संदर्भिय क्र.२ च्या शासन निर्णयान्वये मुदतवाढ देण्यात आली होती.

२. या योजनेतर योजनेखालील ३८ अस्थायी पदांना दिनांक १.३.२०१९ ते दिनांक २८.२.२०२० पर्यंत मुदतवाढ देण्याचा प्रस्ताव प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भिय क्र.३ च्या पत्रान्वये शासनास सादर केला आहे.

३. वित्त विभागाने त्यांचे संदर्भाधिन क्र.४ च्या शासन निर्णयान्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच, यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु, ज्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दिनांक १.३.२०२० ते दिनांक ३१.८.२०२० पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेले आहेत.

४. उक्त परिस्थितीत "राज्यातील संवेदनशील वनक्षेत्रात वनसंरक्षणाकरीता राज्य राखीव पोलीस दलाच्या तुकडया कायमस्वरुपी वन विभागाकडे ठेवणे" या योजनेतर योजनेखालील या शासन निर्णयासोबतच्या विवरणपत्र "अ" येथील एकूण ३८ अस्थायी पदास दिनांक १.३.२०२० ते दिनांक ३१.८.२०२० पर्यंत पुढे चालू ठेवण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

५. सदरहू पदावर होणारा खर्च हा खाली नमुद केलेल्या लेखाशिर्षाखाली दर्शविण्यात यावा व त्याखालील सन २०२०-२१ या वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

| | | |
|---|---|---|
| प्रधान शीर्ष | - | २४०६ वनीकरण व वन्यजीवन (योजनेत्तर) |
| उपप्रधान शीर्ष | - | ०१ वनीकरण |
| गौण शीर्ष | - | १०१ वनसंधारण विकास व पुनर्निर्मिती |
| उप गौण शीर्ष | - | (०३) आग लागण्यापासून वनांचे सरंक्षण |
| | | (०३)(०१) आग लागण्यापासून वनांचे सरंक्षण |
| | | (२४०६ ०१३१) |

६. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क, दिनांक १२.२.२०२० मधील तरतुदीनुसार विभागास असलेल्या प्राधिकारात सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२००३३११५५११६६८१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUJAY DEORAO DODAL

Digitally signed by SUJAY DEORAO DODAL
DN: CN = SUJAY DEORAO DODAL, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = REVENUE AND FOREST
Date: 2020.03.31 15:54:22 +05'30'

**(सुजय दोडल)**
**सह सचिव (वने)**
**महसूल व वन विभाग**

**प्रति,**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संरक्षण), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), नागपूर, ठाणे, धुळे.
५) महालेखापाल-१/२(लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
६) महालेखापाल-१/२, (लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
७) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
८) वित्त विभाग, व्यय-१०/ अर्थ-६, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
९) वित्त विभाग, वित्तिय सुधारणा-१, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१०) ब-१/फ-२/फ-४ कार्यासने, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
११) फ-६ कार्यासन, महसूल व वन विभाग (निवडनस्ती), मंत्रालय, मुंबई-३२.

**<u>शासन निर्णय क्रमांक :- टिआएस- ०२/२०२०/प्र.क.४६/फ-६,</u>**

**<u>दिनांक ३१.३.२०२० सोबतचे विवरणपत्र "अ"</u>**

खालील तक्त्यामध्ये नमूद करण्यात आलेली पदे शासन निर्णय गृह विभाग क्र.एम.एस. आय. (८९५/१३३६/प्र.क्र.६/पो.ल./३/दिनांक २६.६.१९९७ अन्वये निर्माण करण्यात आली आहेत.

| अ. क्र. | पदनाम | पदसंख्या |
|---|---|---|
| १ | सशस्त्र पोलीस उपनिरिक्षक | १ |
| २ | सशस्त्र पोलीस हवालदार | ६ |
| ३ | सशस्त्र पोलीस शिपाई | २४ |
| ४ | चालक पोलीस शिपाई | ३ |
| ५ | सहायक स्वयंपाकी (सहायक आचारी) | २ |
| ६ | भोजन सेवक | २ |
| | **एकूण** | **३८** |

SUJAY DEORAO DODAL

Digitally signed by SUJAY DEORAO DODAL
DN: CN = SUJAY DEORAO DODAL, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = REVENUE AND FOREST
Date: 2020.03.31 15:54:54 +05'30'

**(सुजय दोडल)**
**सह सचिव (वने)**
**महसूल व वन विभाग**